# महाराष्ट्र शासन

क्र. संकीर्ण २०१७/प्र.क्र.२०/२०१७/कोषा प्रशा-५
वित्त विभाग,
मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ११ जुलै, २०१८

**संदर्भ** :१) शासन अधिसूचना , सामान्य प्रशासन विभाग क्र. आरव्ही २००४/प्र.क्र१५/०४/१२, दि.२५.५.२००६
२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.पीओडी१००७/प्र.क्र.९/१८(र.व का.), दि.१४.११.२०१३
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण२०१२/प्र.क्र.५४/१८(र.व का.),दि.११.८.२०१४

## कार्यालयीन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील कलम ९ (१) व (२) मधील तरतूदीस अनुसरुन शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध नियम, २०१३ मधील नियम - ४ व नियम - ६ अनुसार कार्यासनाशी संबंधित बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्याबाबत अधिका-यांचे तीन स्तर निर्धारित करण्यासाठी दि. ९ सप्टेंबर, २०१४ रोजी शासन आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

२. कार्यासनाशी संबंधित विषयाबाबत खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे कार्यासनातील विषय व त्यांचे सादरीकरणाचे स्तर निश्चित करण्यात येत आहेत.

| अ. क्र | विषय | सादरीकरणासाठी अधिकाऱ्यांचे स्तर | | |
|---|---|---|---|---|
| | | प्रथम | व्दितीय | तृतीय |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | महाराष्ट्र कोषागार नियमांचे अर्थ उकल यासंबंधी प्रकरणे, नियमात दुरूस्ती करणे | सहायक कक्ष अधिकारी<br>कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव<br>मा.राज्यमंत्री<br>मा.मंत्री |
| २ | कोषागारातील जमा/खर्च इ.संबंधीचे नियम. | सहायक कक्ष अधिकारी<br>कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| ३ | मुद्रांकाचे नुकसानीबाबतची प्रकरणे. | सहायक कक्ष अधिकारी<br>कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| ४ | राजपत्रित अधिकाऱ्यांचे वेतन व भत्ते, अराजपत्रित कर्मचारी आस्थापनेच्या देयकांच्या नमुन्यात काढण्याबाबत सुधारीत कार्यपद्धती | सहायक कक्ष अधिकारी<br>कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव<br>मा.राज्यमंत्री<br>मा.मंत्री |
| ५ | निवृत्तीवेतनाचे प्रदान राष्ट्रीयकृत बँकांमार्फत करण्याबाबत. | सहायक कक्ष अधिकारी<br>कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव<br>मा.राज्यमंत्री<br>मा.मंत्री |
| ६ | कोषागारे धनादेश पद्धती व तद्नुषंगिक बाबी. | सहायक कक्ष अधिकारी<br>कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| ७ | कोषागारे नियमांतर्गत असलेले लेख्यांचे नमूने तयार करणे/सुधारीत करणे. | सहायक कक्ष अधिकारी<br>कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव<br>मा.राज्यमंत्री<br>मा.मंत्री |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८ | खाजगी/स्थानिक संस्थांच्या स्थानिक लेखा परीक्षेच्या बाबी, तसेच स्थानिक लेखा परीक्षेचा वार्षिक कार्यक्रम. | सहायक कक्ष अधिकारी कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| ९ | भांडार पडताळणी यंत्रणेशी संबंधित बाबी. | सहायक कक्ष अधिकारी कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| १० | वित्तीय प्रशासकीय अधिकारांचे प्रदानविषयक बाबी. | सहायक कक्ष अधिकारी कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव मा.राज्यमंत्री मा.मंत्री |
| ११ | निवृत्तीवेतनधारकाने निवृत्ती वेतनाचे संयुक्त नावे खाते उघडणे, स्वीय प्रपंजी लेखा, सेवार्थ, आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यास मंजूरी देणे व अन्य बाबी. | सहायक कक्ष अधिकारी कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| १२ | आयकर विषयक बाबी. | सहायक कक्ष अधिकारी कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव मा.राज्यमंत्री मा.मंत्री |
| १३ | मंत्रालयीन प्रशासकीय विभागांकडून महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील नियमाशी निगडीत बाबींसंदर्भात प्राप्त होणाऱ्या अनौपचारिक संदर्भ नस्त्या हाताळणे. | सहायक कक्ष अधिकारी कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| १४ | वरील विषयासंबंधी न्यायालयीन प्रकरणे, लोकसभा/राज्यसभा,विधानसभा/विधान परिषद प्रश्न, ठराव इत्यादी बाबी | सहायक कक्ष अधिकारी कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव मा.राज्यमंत्री मा.मंत्री |

३. वरील स्तरावर वरिष्ठ अधिकाऱ्यांचे निर्देश असल्यास किंवा अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

४. सदर शासन कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१८०७१११६०१५३७७०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anudeep Shrinivas Dighe

Digitally signed by Anudeep Shrinivas Dighe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=75f50c6671abf79e06e7d05c1f27cdae17ad6b947f5b0d740fa705320bede741, cn=Anudeep Shrinivas Dighe
Date: 2018.07.11 16:06:27 +05'30'

(अनुदिप दिघे)
शासनाचे उप सचिव

**प्रत :**

१) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) प्रधान सचिव ( ले व को) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३) उप सचिव (कोषा प्रशा ५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) उप सचिव (प्रशासन), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) अवर सचिव (प्रशासन २), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) निवड नस्ती.